**वाहनचालकाची सेवा पुरवठा करण्यास चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी सस्था मर्या., मुंबई या संस्थेस दि.३०.०६.२०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**File No. MDD-101/65/2023-Desk-1**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई-४०० ०३२
दि. २४ एप्रिल, २०२३

वाचा:- १) शासन परिपत्रक, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र. कौविउ-२०१८/प्र.क्र.५४ (भाग-३)/रोस्वरो-१, दि.०२.०३.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२४/२०/आ.पु.क., दि.३०.०९.२०२०.
३) चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहाकारी संस्था मर्या., मुंबई या संस्थेसोबतचे करारपत्र, दि.१७.०३.२०२१.
४) शासन निर्णय, अ.वि.वि., क्र. संकीर्ण १४२१/प्र.क्र.१२/का.१, दि.३०.०३.२०२१.
५) शासन निर्णय, अ.वि.वि., क्र. संकीर्ण १४२१/प्र.क्र.१२/का.१, दि.२९.०६.२०२१.
६) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८,दि.१४.०३.२०२३

प्रस्तावना:-

कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकास अनुसरून या विभागास १ वाह चालक अंशकालीन पदवीधर उमेदवारांमधून किंवा सेवा सोसायटीमार्फत उपलब्ध करुन देण्याची विनंती सहायक आयुक्त, जिल्हा कौशल्य विकास यांना करण्यात आली होती. सहायक आयुक्त, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई शहर यांनी या विभागाकरिता एक वाहन चालक उपलब्ध करुन देण्याच्या कामाचे वाटप चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या., मुंबई या संस्थेस केले होते. त्यानुसार या विभागासाठी दि.०१.०४.२०२१ ते दि.३१.०३.२०२३ या कालावधीकरिता एक वाहन चालक पुरविणेबाबत चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या., मुंबई या संस्थेसोबत संदर्भ क्र.३ येथील करार करुन त्याबाबत संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. उक्त संस्थेचा सेवा पुरवठा करण्याचा कालावधी दि.३१.०३.२०२३ रोजी संपुष्टात आला आहे.

२. बाह्ययंत्रणेकडून कामे करुन घेण्यासाठी सेवापुरवठादार संस्था/ एजन्सी यांच्या पॅनला शासन निर्णय, उद्योग , ऊर्जा व कामगार विभाग, दि.१४.०३.२०२३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार या विभागातील वर्ग ३ व वर्ग ४ ची पदे बाह्ययंत्रणेमार्फत भरण्याचे विभागाच्या विचाराधिन आहे.

३. चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. मुंबई या संस्थेसोबत वाहनचालाकाचा पुरवठा करणेबाबत केलेल्या करारातील अ.क्र. १९ येथील अटी व शर्तीनुसार मुदतवाढ देणे अथवा

कालावधी कमी करण्याचे अधिकार शासनाकडे राखून ठेवण्यात आले आहेत. त्यामुळे उक्त पॅनल मधील सेवापुरवठादार संस्थांमार्फत या विभागास मनुष्यबळ पुरवठा होईपर्यंत चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. मुंबई या संस्थेस दि.३०.०६.२०२३ पर्यंत वाहनचालकाच्या सेवा पुरविण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

अल्पसंख्याक विकास विभागास खालील दराने एक वाहन चालक पुरविण्यासाठी चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या. मुंबई या संस्थेस दि.३०.०६.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे वाटप केलेल्या संस्थेचे नाव | वाहनचालकाचा प्रतिमाह दर | अतिकालिक भत्ता (प्रतितास) | |
|---|---|---|---|---|
| | | | मुंबई मध्ये | मंबई बाहेरील |
| १ | चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या., मुंबई | प्रतिमाह ठोक रक्कम रु.१८,०००/- (अक्षरी रुपये अठरा हजार फक्त)+ साप्ताहिक सुटीच्या (रविवार) दिवसी काम केल्यास वेतन (भत्ते) | रु.४०/प्रतितास+ रात्री १२ नंतर रु.१००/- जेवण व प्रवास भाडे लागू | रु.४०/- प्रतितास + मुंबई बाहेरील भत्ता रु.२५०/- |

२. वाहनचालकाच्या सेवा पुरविणेबाबत चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या., मुंबई या संस्थेसोबत केलेल्या दि.१७.०३.२०२१ च्या करारामधील अटी व शर्ती सदर संस्थेस बंधनकारक राहतील.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दि.२८.०९.२०१८ अनुसार सेवा पुरवठादाराला करावयाच्या प्रदानातून २% TDS व २% CGST/ SGST (प्रत्येकी १% याप्रमाणे) रकमेची कपात करण्यात येईल. तसेच सेवा पुरवठादार संस्थेला एकूण देय रकमेवर CGST/SGST प्रत्येकी ९% इतका अदा करण्यात येईल.

४. वाहनचालकास आठवड्यातून एक दिवस (रविवार) साप्ताहिक सुटी असेल. तथापि त्या दिवशी काम केल्यास नियमानुसार वेतन (भत्ते) देय असतील. इतर सार्वजनिक सुट्ट्या अनुज्ञेय असणार नाहीत.

५. उक्त खर्च "मागणी क्र. झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २०५२, सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, ०९०, सचिवालय (००) (०१), अल्पसंख्याक विकास विभाग (अनिवार्य) (२०५२ ६२४) मधील उपलेखाशीर्ष १०, कंत्राटी सेवा" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या निधीतून भागविण्यात येईल.

६. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०२३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उप विभाग- चार मधील अ.क्र.११ अनुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४१८५३३३२२१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANAND
NARAYANRAO
BHONDVE

Digitally signed by ANAND NARAYANRAO BHONDVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D040EF80427E869FA7C6F2F326EAF61F9B4591294C9BE6229580E816D54D3859, cn=ANAND NARAYANRAO BHONDVE
Date: 2023.04.24 18:59:20 +05'30'

**( आ. ना. भोंडवे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), प्रतिष्ठा भवन, महर्षी कर्वे रोड, न्यु मरीन लाईन, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन, जी. ओ. एल. ग्रुप, राजमल, (५ व ६ वा मजला), युनियन बँक ऑफ इंडियाच्या वर, ८४, वीर नरीमन रोड, चर्चगेट, मुंबई-२०.
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू), मुंबई-५१.
४) उप सचिव (वित्तिय सुधारणा-१/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) सचिव (अ.वि.वि.) यांचे स्वीय सहायक, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) अध्यक्ष, चंद्रकांत सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या., मुंबई, १९-ए/२४, चासकर चाळ, डी.पी. वाडी, घोडपदेव, मुंबई-३३
७) निवडनस्ती (का.१).